**गौण खनिजावरील स्वामित्व धनापोटी प्राप्त होणारी रक्कम "क" वर्ग नगरपरिषदांना सहाय्यक अनुदान म्हणून वितरीत करणेबाबत..(सन २०१४-१५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१५/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २० मार्च,२०१५

**संदर्भ** :-१) सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचलनालय, यांचे पत्र क्र.नपप्रसं-२०१४-१५/अर्थसंकल्पीय अंदाज/प्र.क्र.५४/का-८
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक ०२ जानेवारी २०१५
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-एमएमआर-१०८१/१३३४-जी.७ दिनांक १६/१/१९८५
४) शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्रमांक-जीएनटी-१०८५/सीआर-४१/८४ /युडी-१० दिनांक २१ मार्च, १९८६

**प्रस्तावना :-**

राज्यातील "क" वर्गीय नगरपरिषदांच्या साधनसामग्रीत वाढ करुन त्यांची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी नगरपरिषद क्षेत्रात गौण खनिजापासून शासनास मिळणारे स्वामित्व धन नगरपरिषदांना उक्त संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयान्वये गौण खनिजावरील प्रापत होणारे स्वामित्व धन "क" वर्ग नगरपरिषदांना देण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार उक्त संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयान्वये अनुदानाचे रुपाने (रुपये एक लक्ष इतक्या मर्यादेत) वित्तीय सहाय्य म्हणून देण्याबाबत निर्णय झाला होता, त्यामध्ये दिनांक ११ जुलै, २००० अन्वये सुधारणा करण्यात आली असून, वित्तीय सहाय्याची मर्यादा रु.५.०० लक्ष इतकी करण्यात आलेली आहे. त्यानुसार रु.५.०० लक्ष इतक्या मर्यादेत अथवा वसूल स्वामित्व धनाची रक्कम यापैकी कमी असलेली रक्कम "क" वर्ग नगरपरिषदांना अनुदान म्हणून देय आहे.

**शासन निर्णय :-**

तद्नुषंगाने उक्त संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुलक्षून व उक्त नमूद प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सन २०१४-१५ करिता वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या (८५%) मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजुरी दिलेली असून, त्यानुसार लेखाशीर्ष ३६०४०१७४ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूद रु.६६,७५,९००/- (रुपये सहासष्ट लक्ष पंचात्तर हजार नऊशे फक्त) इतकी रक्कम राज्यातील "क" वर्ग नगरपरिषदांना त्या प्रमाणात वितरीत करण्यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचलनालय, वरळी यांचेकडे या शासन निर्णयान्वये सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

०२. सदरील निधी आहरित करुन वितरीत करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३. याकरिता होणारा खर्च " मागणी क्रमांक-एफ-०४, ३६०४-स्थानिक, स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा, (००)(०७) गौण स्वरुपाच्या खनिजावरील स्वामित्व धनासाठी "क" वर्गीय नगरपरिषदांना सहायक अनुदानाचे प्रदान (३६०४०१७४) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१०९/व्यय-३, दिनांक २५/२/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१६०२२९७२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shashikant Narhari Yoge

Digitally signed by Shashikant Narhari Yoge
DN: CN = Shashikant Narhari Yoge, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2015.03.27 16:11:56 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
५) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६) कार्यासन व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कार्यासन नवि-४ / संगणक कक्ष/ नवि-३१, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,
९) निवडनस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.